सन २०१०-२०११ या वर्षाकरिता खावटी कर्ज वाटप योजनेची अंमलबजावणी करणे.

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय, क्र. खाकवा-२०१०/प्र.क्र.५६/का.३**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : १७ जून, २०१०.**

वाचा: १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र-शाआशा-१६०१/प्र.क्र.४३/का.१३ दिनांक ५ मे, २००१.
२) शासननिर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.खाकवा-२००४/प्र.क्र.९६/(भाग-२)/ का.८, दि.२० जुलै, २००४.
३) शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग,क्र. खाकवा-२००५/प्र.क्र.८०/का.८, दि.२४ जुन, २००५.
४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.खाकवा-२००४/प्र.क्र.९६/(भाग-२)/ का.८, दि. ९ ऑगस्ट, २००५.
५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. खाकवा-२००७/प्र.क्र.८२/ का.८, दि. १९ मे, २००६.
६) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. याचिका-२००७/प्र.क्र.१४६/का-८, दि.२४ मार्च २००८.
७) शासन परिपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र. याचिका-२००७/प्र.क्र.१४६/का-८, दि. ३० मे,२००८.
(८) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.खाकवा-२०१०/प्र.क्र.६/का.३, दि. ३१ मार्च, २०१०.

**प्रस्तावना** : आदिवासी भागात सावकार व व्यापाऱ्यांकडून होणाऱ्या आदिवासी लोकांची पिळवणूक थांबविण्यासाठी महाराष्ट्र आदिवासी आर्थिक स्थिती (सुधारणा) अधिनियम, १९७६ पारित करुन सावकारी बंद करण्यात आली. तसेच पावसाळयात जून ते सप्टेंबर या कालावधीत रोजगार उपलब्ध होत नाही म्हणून आदिवासी उपयोजना क्षेत्रातील आदिवासी (अल्प भूधारक, भूमिहीन व शेतमजूर) यांना आर्थिक अडचण निर्माण होऊ नये तसेच या कालावधीत (जून ते सप्टेंबर या कालावधीत) त्यांची उपासमार होऊ नये म्हणून सन १९७८ पासून खावटी कर्ज योजना सुरु करण्यात आली आहे. सदर योजना महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचेमार्फत राबविली जात आहे यासाठी शासनाकडून आदिवासी विकास महामंडळास निधी उपलब्ध

करुन दिला जातो. संदर्भ क्र. ०८ येथील दिनांक ३१ मार्च,२०१० च्या शासन निर्णयान्वये सन २०१०-११ करिता एकूण २ लाख लाभार्थ्यांचे उद्दिष्ट खावटी कर्ज वाटप योजनेतंर्गत देण्यात आलेले आहे. तथापि, सन २०१०-११ या महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या सुवर्ण महोत्सवी वर्षात २ लाख पात्र लाभार्थ्यांव्यतिरिक्त आणखी २ लाख पात्र लाभार्थ्यांना खावटी कर्ज वाटप योजनेचा लाभ दिल्यास लाभार्थ्यांच्या संख्येत वाढ होईल व त्याचे दृश्यपरिणाम मोठया प्रमाणावर दिसून येतील. म्हणून अधिकाधिक आदिवासी जनतेला खावटी कर्ज योजनेचा लाभ देणे निश्चितच उचित ठरेल. यासाठी सन २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये एकूण ४ लाख आदिवासी लाभार्थ्यांना खावटी कर्ज योजनेचा लाभ देण्यात यावा असे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :- सन २०१०-११ या महाराष्ट्र राज्य स्थापनेच्या सुवर्ण महोत्सवी वर्षात एकूण ४ लाख पात्र लाभार्थ्यांना खावटी कर्ज वाटप योजनेचा लाभ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार दि. ३१ मार्च, २०१० च्या शासन निर्णयातील जिल्हयांना दिलेल्या २ लाख लाभार्थ्यांच्या उद्दिष्टांनुसार सुधारित जिल्हानिहाय उद्दिष्ट निश्चित करण्यात यावे. पात्र लाभार्थ्यांची निवड सदर शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार तात्काळ करण्यात यावी. खावटी कर्जाचे वाटप दि. ३१ मार्च,२०१० च्या शासन निर्णयानुसार तात्काळ सुरु करण्यात यावे.

२. यावरील खर्च "मागणी क्र.टी-५, मुख्य लेखाशिर्ष-२४२५-सहकार-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१)(११) खावटी कर्ज वाटप (२४२५१४९३) ३३-अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ या वर्षात केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेताक २०१००६१७१५२६५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**(सो. ना.बागुल )**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय मुंबई.
प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव,महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग (वने) मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, महसूल व वन विभाग (महसूल) मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, (सहकार) सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, आरोग्य सेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
सहकार आयुक्त, पुणे.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक.
सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
वित्त विभाग (अर्थसंकल्प-१७/व्यय-१४/अर्थसंकल्प-३/अर्थोपाय/कोषा प्रशासन-५),मंत्रालय, मुंबई-३२.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
संचालक ( लेखा व कोषागारे ), संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ, नाशिक / नागपूर.
सर्व प्रादेशिक व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ.
मा.मंत्री / मा.राज्य मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व सह सचिव / उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (का.३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

---------